**मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर यांच्या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना दिनांक ०१.०३.२०१८ ते २८.०२.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१८/८२३/प्र.क्र.४७५/मोप्र-(२)**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०४/१०/२०१८

**पहावे:-** १.शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्र.आढावा १००२/(३३५/२००२) आ (प्रशि), दि.०६/०२/२००३.
२. शासन निर्णय क्र. मुदतवाढ-२०१८/(८०/२०१८)/मोप्र-२ दि.१८.०४.२०१८.
३. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर यांचे पत्र क्र.१६६८/आस्था-८/मुदतवाढ २०१८ दि.०३/०५/२०१८.
४. वित्त विभागाचा शासन निर्णय क्र पदनि २०१६/प्र.क्र.८/आ.पु.क, दि.०५/०३/२०१८.
५. वित्त विभागाचा शासन निर्णय क्र पदनि २०१६/प्र.क्र.८/आ.पु.क, दि.०७/०९/२०१८.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांची निर्मिती संदर्भाधिन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. सदर पदांना संदर्भाधीन क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०१.२०१८ ते २८.०२.२०१८ पर्यंत चालू ठेवण्यास मंजूरी देण्यांत आली आहे. संदर्भ क्रमांक ३ आणि ४ च्या वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०१८ ते दिनांक २८/०२/२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत.

**शासन निर्णय :-**

आता संदर्भीय क्रमांक २ च्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार सोबतच्या **विवरणपत्र - "अ"** मध्ये दर्शविल्यानुसार मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर यांच्या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांना दिनांक ०१.०३.२०१८ ते २८.०२.२०१९ पर्यंत चालू ठेवण्यास शासनाची मंजुरी देण्यात येत आहे.

यावर होणारा खर्च मागणी क्रमांक आय-५, मुख्य लेखाशीर्ष ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, (८०), सर्वसाधारण, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका, (०४) योजनेतर-वेतनावरील खर्चासाठी भाग भांडवली अंशदान, (०४)(०२) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०१ आय १७१) या लेखाशिर्षाखालील खर्ची टाकावा व त्याखालील मंजूर अनुदानातून भागवावा.

हे आदेश वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दिनांक ०५/०३/२०१८ आणि दिनांक ०७/०९/२०१८ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००४१७५७५६४७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Abhay Keshaorao Yedsikar

Digitally signed by Abhay Keshaorao Yedsikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5724dd2e45895f7c2ab554c8d0b0041f388e5f397467c37bb907e6cc635bd0fd, cn=Abhay Keshaorao Yedsikar
Date: 2018.10.04 18:09:42 +05'30'

**( अभय येडसीकर )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**सोबत:**- विवरणपत्र - "अ"

**प्रत:- सहपत्रासह,**

१) वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई,
२) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य मुंबई / नागपूर,
३) महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य मुंबई / नागपूर,
४) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर,
५) मोप्र-(२) संग्रहार्थ.

## विवरणपत्र -अ

## शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१८/८२३/प्र.क्र.४७५/मोप्र-२, दि.०४/१०/२०१८ चे सहपत्र

## नियत अस्थाई आस्थापनेवरील एकूण ३० पदे (०१/०३/२०१८ ते २८/०२/२०१९)

| अ.क्र. | पदनाम | आकृतीबंधानुसार मंजूर पदे | मुदतवाढ द्यावयाची पदे |
|---|---|---|---|
| १ | मुख्य अभियंता | १ | १ |
| २ | सहायक मुख्य अभियंता/कार्यकारी अभियंता | २ | २ |
| ३ | सहायक अधीक्षक अभियंता / उप कार्यकारी अभियंता / उप विभागीय अभियंता /अधिक्षक / सहायक अभियंता श्रेणी-१ | ३ | ३ |
| ४ | कनिष्ठ अभियंता /सहायक अभियंता श्रेणी-२/ शाखा अभियंता | ३ | ३ |
| ५ | विशेष अधीक्षक | १ | १ |
| ६ | अधीक्षक | १ | १ |
| ७ | मुख्य आरेखक | १ | १ |
| ८ | प्रथम लिपिक | १ | १ |
| ९ | मुख्य दप्तर कारकून | १ | १ |
| १० | वरिष्ठ लिपिक | २ | २ |
| *११ | स्वीय सहायक | १ | १ |
| १२ | कनिष्ठ लिपिक | २ | २ |
| १३ | टंकलेखक | ३ | ३ |
| १४ | वाहन चालक | १ | १ |
| १५ | दूरध्वनी चालक | १ | १ |
| १६ | दप्तरी | १ | १ |
| १७ | नाईक | १ | १ |
| १८ | शिपाई | ३ | ३ |
| १९ | चौकीदार | १ | १ |
| | **एकूण** | **३०** | **३०** |

**एकूण पदे ३०**

* शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र.आढावा १००२/(३३५/२००२) आ(प्रशि), दिनांक ०६/०२/२००३ अन्वये जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखाली क्षेत्रिय आस्थापनेचा आकृतीबंध निश्चित झालेला आहे. त्यानुसार मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदे मंजुर आहेत. शासन निर्णय, सा.प्र.वि., क्र.एसआरव्ही १०९५/प्र.क्र.४/९५/१२, दिनांक १८/१२/१९९५ अन्वये उच्चश्रेणी लघुलेखक पदाचे श्रेणीवाढ करण्याचे अधिकार मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, सिंचन सेवा भवन, नागपूर यांना दिलेले आहेत. नागपूर परिमंडळांतर्गत उच्चश्रेणी लघुलेखकांची १५ पदे मंजूर आहेत. त्यातील ४ पदांना स्वीय सहायक पदावर श्रेणीवाढ करण्यास मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प यांनी दिनांक १७/०१/२०१७ च्या कार्यालयीन आदेशान्वये मंजुरी दिली असून मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर या कार्यालयातील श्री.मोरेश्वर रघुनाथ नन्नावरे यांना श्रेणीवाढ देण्याबाबत त्यांच्या स्तरावरुन आदेश निर्गमित करण्याबाबत दिनांक ३१/०३/२०१७ च्या पत्रान्वये मुख्य अभियंता, गोसीखुर्द कार्यालयाने कळविले आहे. त्यानुसार मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर यांचे आदेश क्र.२०३/जा.क्र.३१५८/आस्था.४/२०१७, दि.०२/०८/२०१७ अन्वये श्री.मोरेश्वर रघुनाथ नन्नावरे, उच्चश्रेणी लघूलेखक यांची स्वीय सहायक पदावर पदोन्नती करण्यात आली आहे.